**जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, फलटण, जिल्हा सातारा, यांना "कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी " म्हणून घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. डीडीओ- ०२२४/प्र.क्र.९२/कार्यासन ११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १४ जून, २०२४.

**वाचा :** १. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांक: न्यायस्था-१२१९ प्र.क्र.१९१/कार्यासन ११, दि.०७/०७/२०२३.
२. शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्रमांक: न्यायस्था-१२१९/ प्र.क्र.१९१/कार्यासन ११, दि.२९/०१/२०२४.
३. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे जा.क्र. ब (जन)-१००१/२०२४/३७८, दि. २७.०२.२०२४ चे पत्र.
४. अतिरिक्त जिल्हा व सत्र न्यायालय, फलटण, जि. सातारा यांचे जा.क्र.- २०/२०२४, दि.१४/०२/२०२४ चे पत्र.
५. जिल्हा न्यायालय, सातारा यांचे जा.क्र. लेखा -१८७९/२०२४, दि.२०/०२/२०२४ चे पत्र.

**प्रस्तावना** :

सातारा जिल्ह्यातील फलटण येथे जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय स्थापन करण्यास व त्याकरीता आवश्यक पदे निर्माण करण्यास संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र.२ येथील अधिसूचनेन्वये सदर न्यायालय ०४/०२/२०२४ पासून कार्यान्वित झाले आहे. जिल्हा न्यायालय, जि. सातारा व अतिरिक्त जिल्हा व सत्र न्यायालय, फलटण, जि.सातारा यांनी संदर्भ क्र.३ , ४ व ५ च्या पत्रान्वये विनंती केल्यानुसार जिल्हा न्यायाधीश-१ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, फलटण, जिल्हा सातारा यांना "कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सातारा जिल्ह्यातील जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय, फलटण, जिल्हा सातारा या न्यायालयासाठी जिल्हा न्यायाधीश-१ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, फलटण, जि.सातारा यांना **"कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर न्यायालयातील सर्व प्रकारची देयके कोषागारात सादर करण्यासाठी त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तीय बाबींपुरतेच मर्यादित राहतील.

२. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, दिनांक १७/४/२०१५ मधील भाग - पहिला, उप विभाग एक, अ.क्र.३, नियम क्र.२ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम १५ (३) व १५६ अन्वये दिलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६१४१७५३०६५३१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANGI AJIT SHETYE

Digitally signed by HEMANGI AJIT SHETYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=a80fef4908844f3f0e391754221ba7b421d28c8665334415 0a5e31030c791f4b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7328C41D6A5210C49CCE931861626D508AE4537D 7BB43F92AC6D5796595AADB8, cn=HEMANGI AJIT SHETYE
Date: 2024.06.14 18:09:55 +05'30'

**( हेमांगी शेट्ये )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१) सहायक प्रबंधक (निरिक्षण), मा. उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय, सातारा.
३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय, फलटण , जि.सातारा.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, जि.सातारा.
६) उप कोषागार अधिकारी, फलटण , जि.सातारा
७) कक्ष अधिकारी, कार्या.२३/२०,विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) कक्ष अधिकारी, कोषा - (प्रशा-५)/विनियम/ व्यय-५, वित्त विभाग ,मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती.